# HISTORY OF ENGLAND

Translated

for the

BOMBAY NATIVE EDUCATION SOCIETY

into the

# MARATHEE LANGUAGE

VOL. 1

POONA

LITHOGRAPHED

At the Press of the Department of Public Instruction

1832

# इंग्लंड देशाची बखर.

मुंबईचे शिक्षामंडळी करितां,

मराठी भाषेंत केली.

भाग १

सन १८३२

मुकाम पुणें.





# हा ग्रंथ वाचणारांस सूचना

मोठे अक्षरांनीं जे शब्द लिहिले आहेत ते इंग्रेजी असें समजावें.

इंग्रेजी शब्दांचा अर्थ बहुधा पृष्ठाचे खालचे बाजूस खुणा करून बारीक अक्षरानें लिहिला आहे; आणि कोणते शब्दाचा अर्थ कोणते पृष्ठावर आहे हें कळायाकरितां, आणि ग्रंथामध्यें कोठे कोठे अप्रसिद्ध किंवा प्रौढ संस्कृत शब्द पडले आहेत त्यांचा अर्थ कळाया करितां अक्षरांचे अनुक्रमाप्रमाणें पुस्तकाचे शेवटीं सर्व अप्रसिद्ध शब्दांचा कोश केला आहे: त्या कोशांत इंग्रेजी शब्दांचा अर्थ कोणते पृष्ठावर केला आहे त्या पृष्ठाचा अंक लिहिला आहे.

इंग्रेजी अकारांत शब्दांचे शेवटचे अक्षराचा उच्चार अकार सोडून करावा. गुण, द्रव्य, इत्यादिस्थलीं ण. व्य. या अ-

क्षरांचा

क्षरांचा होतो तसा.

च, ज, या शब्दांचा उच्चार सर्व ठिकाणीं संस्कृतांतील चर्म, जन या शब्दांतील चकार जकारा सारिखा करावा, चामडें, जमा, या शब्दां सारिखा करूं नये.

झ, याचा उच्चार झोंप, झोळी, यांतील झकारा सारिखा करावा.

फ. याचा उच्चार वरचे दांत खालचे ओंठावर ठेवून करावा.

व, हें अक्षर कोठे उअ. कोठे व. आणि क्वचित् केवळ व, असें लिहिलें आहे. त्याचा उच्चार बहुधा उअ, असा करावा.





# इंग्लंड देशाची बखर

## प्रकरण १

### ज्युलियससीझर रोमन[1] लोकांचा राजा याचे चढावा पासून रोमन लोकांनीं ब्रिटेन[2] बेट सोडल्या पर्यंत[3] कथा.



रोमन लोकांचा अधिकार होण्याचे पूर्वीं ब्रिटेन बेट पृथ्वीवर दुसरे ठिकाणीं विशेष प्रसिद्ध नव्हतें. त्या बेटांतील लोक जे जिन्नस उत्पन्न करीत,

---

१ **रोमन**, ह्मणून लोक होऊन गेले, त्यांचें राज्य त्या वेळेस प्रबळ आणि मोठें होतें. त्यांची राजधानी **रूम** शहर.

२ **ब्रिटेन**, ह्मणून बेट आहे; तेथें रहाणारे लोकांचें नाव **ब्रिटन**. त्या बेटाचे दोन भाग आहेत. त्यांचीं नावें, **इंग्लंड**, आणि **स्काटलंड**, इंग्लंड देशांतले लोकांचें नाव **इंग्लिश**, त्यांसच हिंदूलोक इंग्रेज असें ह्मणतात; त्या देशाची ही बखर **ब्रिटेन** बेटाजवळच दुसरें एक **अयर्लंड** ह्मणून बेट आहे.

३ इशाची सनाचे पूर्वीं ५५ वर्षांपासून इशाची सनानंतर ४३ वर्षें पर्यंत.

त्याचा

त्यांचा व्यापार करायाकरितां, बहुत व्यापारी गाले[1] देशाचे समोरचे समुद्रकांठ्यास आन येत असत. प्रथम जाजा बंदरीं त्या व्यापाऱ्यांस रहायास मात्र परमाणगी होती, तीं सर्व ठिकाणें, त्यांहीं पुढें कांहीं दिवसांनतर घेतलीं. तो देश लागवडीच्या आणि व्यापार करायास योग्य असें पाहून, त्या व्यापाऱ्यानीं समुद्राचे कांठीं वस्ती करून तेथील लोकांन कृषिकर्मे प्रवृत्त केलें. परंतु जे लोक मध्यदेशीं रहात होते त्यांसं असा अभिमान होता, कीं या भूमीचे वास्तविक धनीं आह्मीं आहों, आणि हे नवे आले आहेत याणीं आमची भूमी लबाडीनें घेतली; असा विचार करून त्याणीं त्यांशीं अगदीं व्यवहार सोडून दिला होता.

मध्यदेशांत, पुष्कळ लोक गवताचे झोंपड्यांतून रहात असत, आणि गुरें बाळगीत असत. ते दुधावर किंवा पारधीवर उपजीविका करीत. ते आपले आंगावर पशूंचीं चर्मै धारण करीत; परंतु हात, पाय, मांड्या, इत्यादि अंगें त्यांचीं उघडींच असत;

---

१ गाल देश ब्रिटन बेटाचा समोर आहे; त्यास हालीं फान्स, ह्मणजे फांसिस लोकांचा देश असें ह्मणतात.

यांस

त्यांस ते निळारंग लावीत. त्यांचे डोक्यांचे केश, लांब वाढून पाठीवर आणि खांद्यावर लोंबत असत; ते आपले दाढीचे केश काढीत, परंतु मिशा लांब वाढवीत असत. पशुतुल्य लोकांचा पेहरव बहूत करून एकसारखाच असतो; त्या कडे पाहिलें असतां मनांत प्रीति किंवा संतोष उत्पन्न होत नाहीं; परंतु उलटें भय वाटतें.

त्यांचा राज्यांत अनेक लहान लहान परगणें होंते, आणि एक एक परगण्यांत एक एक मुख्य असे—यावरून असें वाटतें कीं, प्रथम मनुष्यांस अशी राज्य करण्याची रीति ठाऊक होती; आणि कुटुंबामध्यें एका वडिलाची सत्ता असती, तीपासून मुळीं या रीतीची उत्पत्ति झाली असेल, असा तर्क दिसतो.

त्यांस कांहीं मोठें भय प्राप्त झालें म्हणजे एकत्र सभा करून सर्वांचा संमतानें ते एक सेनाधिपति नेमीत; आणि त्यास साधारण कामकाज करण्याविषयीं मुखत्यारी देत; मग तो आपल्या मर्जी

प्रमाणें

प्रमाणें युद्ध किंवा तह करी.

त्या लोकांचा फौजेंत बहुत करून पायदळ फार असे, परंतु कारण पडलें असतां युद्धामध्यें ते घोडेस्वारही आणीत; त्यांचे युद्धांत रथ असत, त्यांचा प्रकार असा कीं, त्या फाचा माळळ्याचे शेंव-टीं मोठें विळे बांधिले असत. त्या मुळें ते रथ जिकडे जात, तिकडे धामधूम, आणि भय उत्पन्न होऊन स-मोरच्यांस जखमा होत असत — ज्या समयीं या री-तीनें रथ सैन्याचा विध्वंस करीत, तेव्हां आंतील यो-द्धे कांहीं उगीच बसत नसत; तेही आपले तीक्ष्ण भाले शत्रूंवर टाकीत, धांवत, रथाचे पोलांवर[1] उ-ड्या मारीत, पुनः आपले जागीं येऊन बसत, आप-ले घोडे थांबवीत, आणि समयीं नेटानें फिरवीत. आणि एकादे समयीं शत्रूला भुलथाप द्याया करितां सावधगिरीनें मागें येत.

ब्रिटेन देशाचे लोकांचा धर्माची व्यवस्था हें एक, त्यांचे राज्यकारभाराचें मोठें अंग होतें, आणि

[1] पोल म्हणजे रथास जोडलेल्या ज्या दोन काठ्या असतात ज्यांत घोडा अडकवितात.

द्रूद म्हणून धर्मांचे व्यवस्थापक असत त्यांचा त्यां-
जवर मोठा अंमल चालत असे. द्रुदां सारिखें भ-
यंकर ढोंग दुसऱ्या कोणत्या लोकांत नव्हतें, ते लोकां-
स अनेक रीतीचीं शासनें करीत; जीवास देहांतर
प्राप्ति आहे हा उपदेश करीत; आणि त्यांचे मतानु-
सारी जसे जसे त्यास अधिक भीत, तसे तसे ते आ-
पलें कर अधिक वाढवीत असत. ते नरमेध करी-
त असत; त्याची पद्धति अशी होती. एक वेतका-
ठ्यांची मनुष्या सारिखी आकृति करावी, अशी कीं
त्यांत बहुत मनुष्य एकदां आंत यांचे असले त-
री आळतां यावे, मग त्या मूर्तींत मनुष्यें घालून आग ला-
वून द्यावी, म्हणजे ते एकदांच मरून जात. त्या द्रु-
दांनीं उपदिष्ट जे धर्म त्यांचा आचरणानें ते लोक स-
र्वदा भयभीत आणि मूर्ख असे असत. त्या लोकां-
चे धर्मस्थापक ते द्रूद आपण मोठमोठ्या अवघ-
ड नेमनिष्ठा करीत असत; तशींच त्यांची लोकांत
वागण्याची रीतिही फार सोधी[1] होती, म्हणून लोक

[1] साधी म्हणजे जींत वस्त्रें अलंकार भूषणें यांचा नीटनेटकेपणा नाहीं.

त्यांवर विश्वास ठेवीत, त्यामुळें लोकांचे मनांत भय आणि अज्ञान यांची उत्तरोत्तर वृद्धि होत आई.

तें रानांत, गुहांत, आणि वृक्षांचे ढोलींत रहात, कंदमूळ फळें खात, आणि पाणी पीत; अज्ञा- आचरणामुळें लोक त्यांस मानीत होते इतकेंच केवळ नाहीं, तर ते त्यांची पूजा देखील करीत असत.

त्या लोकांचा व्यवहार त्यांचे गुरूंचा आचरणासारिखा झाला होता. त्यांचें आचरण स्वच्छ असे, परंतु ते क्रूरत्वाविषयीं आणि दांडगाई विषयीं मोटे प्रसिद्ध होते. त्यांचें साहस मोठें होतें. त्यांमध्यें दया किंवा स्थैर्य हे गुण नव्हते.

ब्रिटेन देशाचे लोक या रीतीनें बहुत दिवस अज्ञान दशेंत स्वेच्छाचारी होते, तेव्हां सीझर[1] राजानें गाल देश घेऊन, आपली कीर्ति अधिक वाढावी या इच्छेनें आणि ब्रिटेन देश अनायासें करून प्राप्त होईल असें समजून; तो घ्यायाचा निश्चय केला; मग एके दिवशीं आपली सगळी फौज गलबता

[1] हा रूम शहरचा राजा.

वर चढवून, मध्यरात्रीचे सुमारें आपणही वर चढून, ब्रिटन देशाकडे गलबत हाकारून, दुसरेदिवशीं सकाळीं दोवर शहराचे अवळचेतीरीं पोंहचला. त्या समयीं त्याणें पाहिलें कीं, हातांत शस्त्रें घेऊन लढाई करायाकरितां मनुष्यें कांठावरचे खडपांवर उभीं आहेत.

त्या वेळेस ब्रिटन लोकानीं कासिवलानस ह्या नावाचा एक मनुष्य आपला सेनापति केला होता, परंतु लहान लहान राजे होते ते त्याचे आज्ञेखालीं नरहावे अशा बेतानें, अथवा तो विश्वासू नाहीं असा संशय मानून, त्यास सोडून निघाले, कितिएक आपलें सैन्य घेऊन राज्याचे मध्यभागीं पळून गेले, कितिएक सीझर राजास जाऊन मिळाले. शेवटीं या रीतीनें सैन्य गेलें त्यामुळें कासिवलानस दुर्बळ झाला. मग त्याणें असा निश्चय केला कीं जा रीतीनें तह होईल त्या रीतीनें करावा; नाहींतर थोडे दिवसांनंतर तोही करायास शक्ति राहणार नाहीं. त्या समयीं सीझरराजानें जो करार सांगीतला तो

कासि

इशा
नाचे
पश्चा
वेव

कासिबलानसानें मान्य केला; ते असा कीं, सीझ्झर राजाचा राज्यास पहिल्या करारापेक्षां दुप्पट मनुष्य ओलीस पाठवावे, आणि आपण रोमन लोकांचा ताबेरवालीं असें ह्मणवावें. पुढें सीझ्झर निघोन गेल्यावर ब्रिटन लोकांकडून तहांत अंतर पडलें, तें पुनः यथास्थित चालवायाकरितां त्यास एक वेळ तेथें आणखी यावें लागलें.

आगसूटस, रोमन लोकांमध्यें राज्यकरूं लागला तेह्मां त्याणें ब्रिटेन बेटांत आयाचा बेत केला होता; परंतु पान्नोनियन लोकांनीं पुनः अकस्मात् युद्धाचा उद्योग आरंभिला, त्यामुळें त्याचा बेत तडीस गेला नाहीं.

नंतर तिबिरियस ह्मणून रोमन लोकांचा राजा झाला, त्याणें आपलें राज्य अतिशय मोटें आहे असा विचार करून ब्रिटेना विषयीं उद्योग केला नाहीं, तेह्मांपासून तेथचे लोक नानाप्रकारचे विद्यांचा अभ्यास करूं लागले.

कांहीं दिवशी कालिग्युला ह्मणून रोमन

लोकांचा

रोमन लोकांचा राजा झाला; त्याणें उगीच वेडपणा-
नें चढाव करून ब्रिटन देशांत येऊन लोकांस भय
दाखविलें; तणेंकरून तो लोकांस भयकारक तर
झाला नाहींच, परंतु थट्टेस मात्र पात्र झाला. शेवटीं
क्लादियसाचे राज्यांत रोमन, ब्रिटन देशाचे लोक
आपल्या अंमलाखालीं कोणत्या उपायानें आणा-
वे हा विचार नीटपणीं करूं लागले; आणि युद्धा-
ची तयारी करून तेथें गेले. नंतर त्यांचे पांतियस
इत्यादि सरदार युद्ध करून विजयी झाले.

मोटा प्रयत्न करून आपला देश दुष्ट शत्रूंचे
अंमला पासून मुक्त करावा, असा बेत प्रथम क्यारे-
क्टकस ह्मणून ब्रिटन होता, त्याणें केला. त्याचें सै-
न्य थोडें असतां ही, त्याणें रोमनाशीं नउ वर्षें पर्यंत
युद्ध केलें; शेवटीं त्याचा पराभव करून त्यास आ-
स्तोरियस स्क्यापिलानें धरून मोठ्या उत्साहा-
नें रूम शहरास पाठविलें. त्याला शहरांतून नेत
होते त्या समयीं मौज पहायास लोकांचा मोठा अ-
मुाव झाला होता; त्या कडे पाहून तो विस्मित झा-

ला नाहीं; आणि शहराची शोभा पाहून बोलला कीं, "ज्यांचा घरीं इतकी संपत्ति आहे त्यांणीं माझ्या झोंपड्या करितां मत्सर कांबरें करावा!" राजास त्याची ती दशा पाहून दया आली, आणि त्याचें भाषण ऐकून त्याला आणि दुसरे बंदिवानांला त्याणें मोकळीक दिली.

ऐसिने लोकांची राणी बोदिसिया म्हणून होती तिचे रोमन लोकांनीं हाल केले, याकरितां ब्रिटन लोकांचें आणि त्यांचें पुनः एकवेळ युद्ध झालें. ऐसिनै लोकांचा प्रासाटेगस नामें राजा होता, त्याणें मरणसमयीं आपलें अर्धराज्य रोमनास दिलें, आणि दुसरें अर्ध आपल्या मुलींस ठेविलें; कारण, असें केलें असतां राज्याचा अर्धभाग आपल्या कुटुंबाजवळ अविछिन्न राहील, असें त्यास वाटलें; परंतु ती गोष्ट विपरीत झाली. ती अशी. रोमनाचा प्राक्युरेटर होता त्याणें तें सगळें राज्य जबरदस्तीनें घेतलें. तेव्हां ती विधवा

---

१ हे ऐसिनै लोक इंग्लंड देशांतले एके प्रांतीं राहत असत.
२ जो दुसऱ्याचा कामकारभार चालवितो तो- कारभाऱ्यासारिखा.

बोदिसिया फिर्याद करूं लागली, ते समयीं त्याणें तिला बटकी सारिखें मारायास हुकुम केला, आणि तिच्या मुली बाटविल्या. या जुलुमामुळें सर्व बेटभर बंड उत्पन्न झालें. ती विधवा जांची मुली राणी होती, ते ऐसिने लोक सैन्यें घेऊन प्रथम लढाई करूं लागले; त्यांचे मागून सर्व दुसरे मुलखांतील लोकांनीही तसेंच केलें. बोदिसिया मोठी सुंदर आणि शूर होती, या करितां तिला सैन्याचा सरदारपणा दिला. त्या सैन्यांत २३०००० योद्धे होते. त्याणीं पूर्वी उपद्रव सोशिला होता, तेणें करून संतप्त होऊन रोमन लोकांचीं कितिएक संस्थानें आणि ठाणीं यांजवर हल्ला करून त्यांस जिंकिलें. रोमन लोकांचा सैन्याचा सरदार पालैनस नामें होता, तो जें आपलें मोटें शहर लंडन तें राखाया करितां तेथें त्वरेनें गेला; परंतु तेथें गेल्यानंतर त्याणें माहिलें कीं आपलें सैन्य सुखी रहावें या करितां त्याएका शहराचें शत्रू जें करितील तें करूं दिलें पाहिजे. मग ब्रिटनानीं तें शहर जाळिलें; आणि जे लोक बाकी राहिले होते ते मारिले.

या रीतीनें सत्तर हजार रोमन लोक आणि जे दुसरे परकी होते त्या सर्वांचा विध्वंस केला.

ही फत्ते झाली तेणें करून ब्रिटन लोक चढून गेले आणि शत्रूंची वाट पहात न राहतां मोठ्या धैर्यानें, पालैनसाचें सैन्य होतें त्या ठिकाणीं गले: त्याणें दहा हजार फौज घेऊन चांगले जागीं तळ दिला होता. नंतर ब्रिटनांचें आणि त्याचें मोठें भयंकर युद्ध झालें. बोदिसिया राणी आपल्या दोन मुली बरोबर घेऊन रथांत बसून तेथें आली, आणि मोठ्या शूरपणानें सैन्यास धीर देऊं लागली; परंतु तिचा सैन्यांत कांहीं बंदोबस्त नव्हता, आणि रोमन लोक धिमे, मसलतदार, असे होते, म्हणून त्यांस जय प्राप्त झाला. त्या लढाईंत ब्रिटन लोक ८०००० पडले. दुसरे बहुत लोक रोमनानीं धरून बंदीस घातले. राणीनें शत्रूंचा हातीं सांपडायाचे भयामुळें आपल्या हातीं आपणास मारून घेतलें.

जा सरदारानें शेवटीं रोमन लोकांचें राज्य त्या बेटांत दृढ केलें, त्याचें नाव जुलियस

आग्रिकोला

आग्रिकोला, त्याणें वेस्पेशियन, टैटस, आणि डोमिशियन, हे तिघे रूम शहरांत जों पर्यंत राज्य करीत होते तों पर्यंत शौर्यानें आणि ममतेनें ब्रिटेन बेटांतला अधिकार चालविला.

आग्रिकोला याचे राज्याचे पुढें कितिएक वर्षांनंतर ब्रिटेन देशांत फार दिवस स्वास्थ्य होतें. त्या समयींचें काम कारभाराचें वर्तमान कोणी ग्रंथकारानीं लिहिलें नाहीं.

शेवटीं रूम शहराची बढती अधीक झाली. सर्व पृथ्वीवर बहुत दिवस त्या राज्याचा हुकूम चालला होता, आणि सर्वत्र गुलामगिरी आणि जबरदस्ती प्रसृत झाली होती, त्या मुळें सर्व लोक आपण स्वतंत्र व्हायास यत्न करूं लागले.

हे यत्न चालले होते त्या समयीं ब्रिटेन देशांतून कितिएक उमेदवार पुरुष रोमनांचे शत्रूंस सहाय व्हाया करितां गाल देशांत जात असत; परंतु त्यांचे साह्याप्यासून फळ होत नव्हतें. मग जशी जशी रोमन लोकांची फौज कमी होत चाल-

ली तसे तसे, पिक्ट[1] आणि स्कोट[2] लोक मोठा धीर करून उत्तरे कडील प्रदेश लुटूं लागले. ते चामड्यानें मढविलेले टोंकरांत बसून जा समुद्र तीराजवळ रोमन लोकांचा पाहरा नव्हता, तेथें उतरून आले, आणि सर्व लोकांस मारून भय प्रदर्शन करायास-लागले.

रवी) शेवटीं रोमन लोक, ब्रिटेनांचें रक्षण करायाचा उपाय नाहीं असें पाहून तेथून, अगदीं निघाले. ४३०) ते त्या बेटांत सुमारें ४७० वर्षें पर्यंत राहिले होते. त्या समयीं वेलेंटियन नामें त्यांचा बादशाह होता. त्याणीं जाते समयीं ब्रिटनांस जो पाहिजे तो राजा करायास, आणि मर्जी प्रमाणें राज्य करायास मुखत्यारी दिली. तसेंच आपल्या बुद्धी प्रमाणें त्यांस राज्यादि करायाची मसलत सांगीतली; आणि सैन्याचा बंदोबस्त वगैरे करायास; तसेंच

---

१ पिक्ट आणि स्काट हे लोक ब्रिटेन देशाचे उत्तरे कडचा प्रदेशांत राहत होते.

२ स्काटलंड देशांत रहाराणारे लोकांसच स्काट

किंवा

किल्ले नीट करायास त्यांस शिकविलें. सर्व बेटाभोंवतीं दगडाची भिंत सिबिरस बादशाहाचे वेळची बांधलेली पडून गेली होती, ती नीट करायास त्यांजपाशीं कुशल कारागीर नव्हते, याकरितां रोमनानीं ती नीट करायास मदतही केली.

## प्रकरण २

### साक्सन[1] लोकांची कथा.

सन ४३० पासून ८२७ पर्यंत

ब्रिटन लोक, स्वतंत्र होतांच त्यांला स्वतंत्रपणा प्राप्त झाला हा आपला मोठा घात झाला असें वाटूं लागलें. पुढें पिक्त आणि स्काट लोक एकत्र मिळून; त्याणीं ब्रिटेन देश आपलाच आहे,

१ जर्मनी ह्मणून [illegible]चां पूर्वेस देश आहे, त्यांत साक्सनी ह्मणून एक परगणा आहे तेथील लोकांचें नाव साक्सन.

आणि

आणि तो आपण सहज घेऊं असा मनांत अभिमान धरून रोमनानीं उत्तरे कडचे भागास जी भिंत बांधिली होती तेथें येऊन, ती मोडिली; आणि ते त्या वाटेनें येऊन सर्व मुलूख लुटूं लागले. त्या समयीं ब्रिटनानीं रानांचा आणि डोंगरांचा आश्रय केला.

अशा विपत्तींत ब्रिटनांस साक्सन लोकांचे साहाय्याचें अगत्य पडलें. साक्सन लोक मोटे शूर होते; ते बळानें आणि शौर्यानें दुसरे जर्मन मुलुखांस अजिंक होते. त्यांस लोक केवळ देवा समान मोजित. त्यांस स्वस्थ रहायाची आवड नव्हती. युद्ध करणें हा आपला धंदा होय असें त्यांस वाटत असे. जा लोकांस नेहमी युद्धाची प्रीति असत्ये, ते क्रूर असतातच, या करितां साक्सन लोक मोटे दुष्ट होते असें त्यांचा शत्रूंनी वर्णन केलें आहे.

वार्टिजर्न नामें त्या समयीं ब्रिटन देशाचा राजा होता त्याणें सत्कारानें बोलाविलें, असें पाहून ते लोभी लोक फार आनंद पावले, आणि १५०० माणसें घेऊन, हेंजिस्त, आणि हार्सा, या नावा-

चे दोन भाऊ होते त्यांस सरदार करून, **थानेटबे-टास** गेले.तेथें जाऊन ते फार दिवस निरुद्योगी न राहतां, **ब्रिटनांची** फौज बरोबर घेऊन **पिक्त** आणि **स्काट** लोकांसमोर गेले. त्याणीं शत्रूंस **लिंकोल** प्रांतांत गांठलें, आणि तेथें त्यांचा पराभव केला.

**साक्सन** लोकांनीं या देशाची शेतकी पाहून, आणि आपला मुळचा देश ओसाड असें मनांत आणून, आपल्या नव्या संपत्तींचा विभाग आपले भाऊबंदांस मिळावा या इछेनें, तेथून आपले पुष्कळ लोक बोलावून आणिले. तेव्हां त्यांचे देशांतून ५००० लोक सत्रा गलबतांत बसून आले, आणि तेथे नेहमीचें एक ठाणें करून राहिले.

ब्रिटन ग्रंथकारानीं, आपल्या देशाचा सहज पराभव झाला याचें कारण असें लिहिलें आहे कीं, **साक्सन** लोक जसे शूर होते तसे ते दगलबाजही होते. याविषयीं त्याणीं एक गोष्ट सांगीतली आहे कीं, हेंजिस्ताची मुलगी **रोइना** नामें

होती तीविषयीं वार्टिजर्न राजा नकाम झाला; तिशीं लग्न कराया करितां त्याणें लागवडीचा केंत प्रांत तिचा बापाला दिला. मग तो साक्सनी लोकांचा हातांतून कधीं सुटला नाहीं. आणि दुसरें असें लिहिलें कीं, एग्लस्फीलड शहराजवळ वार्टिमर राजा जय मेळवून पुढें लवकरच मेला; मग वार्टिजर्न त्याचा बाप होता त्यास तक्तावर बसविलें. त्या भोळ्या राजास हेंजिस्तानें मेजवानीस बोलावून नेऊन त्याचे ३०० दरबारी लोक दगलबाजीनें मारिले; आणि त्यास धरून बंदीस घातलें. त्याणें केंतांचें संस्थान स्थापिलें,
त४५५ आणि तें आपण घेतलें. .

हेंजिस्त मेल्यानंतर, दुसऱ्या कितिएक जातीचे लोक आपले भाऊबंदांचा मोटेपणा पाहून आपणहि जमून तेथें गेले. त्याचे पूर्वीं एला आणि त्याचे तीन पुत्र यांचे आज्ञेनें साक्सनी
१४७७ फौजेनें काहीं दिवस दक्षिण साक्सनी संस्थानाचा पाया घातला होता, परंतु तें करायास नीठ य-

त्न लागला, आणि कितिएक खूनही पडले. त्या नव्या संस्थानांत सरे, ससेक्स, आणि न्युफारेष्ट हे प्रांत होते, आणि केंत प्रांताचे हद्दी पर्यंत त्याची मर्यादा होती.—

दुसऱ्या आगींचे साक्सन लोक सर्दिक आणि त्याचा पुत्र केनरिक या दोघांचा आज्ञेखालीं पश्चिमे कडे गेले; त्याणीं पश्चिम साक्सन असें आपलें नाव ठेविलें. ब्रिटनानीं त्याचें निवारण केलें; परंतु जर्मनी देशांतून त्यांस मदत आली, आणि त्या बेटांत जे त्यांचे आतीचे होते तेही त्यांस सहाय झाले, म्हणून त्याणीं ब्रिटनास पळविलें. पुढें मोटा विख्यात असा जो आर्थर राजा झाला त्याणें त्यांचें चालूं दिलें नाहीं, तथापि जें त्याणीं मिळविलें तें राखायास ते समर्थ होते. सर्दिक आणि त्याचा पुत्र केनरिक याणीं, त्या बेटांत तिसरें एक साक्सनी संस्थान केलें, त्याचें नाव पश्चिमसाक्सनी संस्थान असें पडलें, त्यांत हांत्स, डासेंत, विल्टस, बर्कस, आणि एलआवबेट, हे प्रांत होते.

आर्थर राजानें या साक्सनी सरदाराशीं युद्ध केलें त्यामुळें त्याची मोटी कीर्ति झाली. शेवटीं त्याचें धैर्य जरि निष्फळ झालें तथापि, त्या समयींचे कथांत त्याचें फार वर्णन केलें आहे, म्हणून त्याची थोडीशी गोष्ट एथें सांगीतली पाहिजे. त्याचे वडील कोणते होते या विषयीं ग्रंथकारांचा सिद्धांत नाहीं, अनेक मतें आहेत. तें कसेंही असो, तथापि तो मोटा शूर होता ही गोष्ट खरी आहे; आणि नुसत्या शौर्यानेंच जर ब्रिटनाचे हाल दूर व्हावयाजोगे असते, तर त्याचा गुण सफळ झाला असता. त्याणें साक्सनास अनुक्रमानें बारा लढायांत जिंकिलें. बर्क्स् प्रांतांतलें आबेदन गांवांजवळ एक लढाई झाली तींत चारशें चाळीस शत्रूंचे योद्धे त्याणें आपल्या हातानें मारिले, अशी कथा सांगतात. परंतु साक्सनी लोक बहुत आणि बळवान होते, त्यामुळें एके शूर पुरुषाच्यानें ते देशांतून बाहेर काढले गेले नाहींत; त्याचे जयाचें फळ होत नसे, परंतु त्यापासून तह होई. या

रीतीनें शत्रूंची वढती होत चालली, आणि राजा ज्ञाता-रा झाला तेव्हां कांहीं गृहसंबंधी दुःखांत पडल्या मुळें त्यांचे वृद्धीचा प्रतीकार त्याचे हातानें झाला नाहीं. त्याची पहिली बायको सामर्सेट शहराचा राजा मिलनास होता, त्याणें पळवून नेली. नंतर ती त्याणें लपवून ठेविली होती तें ठिकाण आर्थर राजास कळलें, आणि तो तेथें सैन्यासुद्धां जाऊन त्या लबाडा कडून बळानें तिला घेऊन आला. त्याचे दुसरे बायकोची कांहीं गोष्ट लिहिलेली नाहीं. परंतु त्याचे तिसरे बायकोजवळ त्याचा पुतण्या माद्रेड नामें होता त्याणें लबाडी केली, या मुळें त्या दोघांत कलह उत्पन्न झाला. आणि त्याचें युद्ध होऊन त्या दोघांनी आपले हातानें आपणास मारून घेतलें.

पश्चिमसाक्सनांची या रीतीनें वढती होत होती, तेव्हां दुसरे साक्सनी लोक वेटाचे दुसरे कडून येऊन बहोच उद्योग करीत, ते त्यांचे सफळ होत असत. तसेच जर्मनी मुलखांतून पुष्कळ मु-

शाफर

शाफर घेत असत. त्यांचा अफा ह्मणून एक सर-
दार मोठी फौज जमवून आला त्याणें केंमरीज,
सन ५७१ सफोक, आणि नार्फोक हे प्रांत घेतले. ते व्हां
त्या सरदारास फौजेनें ईष्ट आंग्लाचा राजा अशी
पदवी दिली. हें ब्रिटेन देशांत साक्सनाचें चवथें
संस्थान झालें.

सन ५२७ दुसऱ्या एके फौजेनें एक नवें संस्थान स्था-
पिलें, त्याचें नाव एसेक्स ह्मणजे ईष्ट साक्सनी ठे-
विलें. त्यांत, एसेक्स प्रांत मिड्लसेक्स, प्रांत
आणि हार्तफोर्द प्रांताचा एक भाग इतका मुलूख
होता. हें संस्थान केंन्टाचे संस्थानापासून वेगळें
पांचवें संस्थान झालें

सन ५८४ सहावें संस्थान मर्शियाचें होतें, त्यांत स-
र्व मध्यदेश सेवर्न नदीचे तीरापासून वर सांगीतले
दोन राज्यां पर्यंत होते.

सन ५४७ सातवें संस्थान नर्थंबरलंड, तें सर्वांहून
मोठें आणि बळकट होतें. तें दोन लहान साक्स-
नी संस्थानें मिळून झालें. त्यांत एकाचें नाव ब-

निशिया

निशिया (म्हणजे नर्थंबर्लंड आणि बिशापिक आयर्लंड हे दोन प्रांत) दुसऱ्या संस्थानांतले लोकांचें नाव दैरि, ते सांप्रतचे लांका प्रांत आणि यार्क प्रांत एथें राहत होते. एथेलरेड म्हणून नर्थंबर्लंडाचा राजा होता. त्याणें आपला मेहुणा दैरीचे राज्यांतून बाहेर काढून दिला; आणि त्याचा मुलूख घेऊन हीं दोन राज्यें एकत्र केलीं — या रीतीनें ब्रिटन लोक अगदीं बुडाले गेले, त्यामुळें हीं सात संस्थानें दृढ झालीं तद्वांपासून तीं साक्सन हेप्टार्कि या नावानें प्रसिद्ध आहेत.

बेटांतील सर्व प्रदेशांत साक्सनी लोक या रीतीनें निर्भय झाले: आणि ब्रिटन लोकांशीं लढाई करायास मिळेनाशी झाली म्हणून ते आपापल्यांत कज्जा करूं लागले. जा मुलखांत राज्याचीं लहान लहान संस्थानें झालीं तेथें भांडण व्हायाचेंच. मग पुष्कळ लढाया दंगे, आणि बंडें, झाल्यानंतर शेवटीं सर्व लहान संस्थानें एग्बर्ट नामें ए-

१ हेप्टार्कि म्हणजे सात संस्थानांचा समुदाय.

सेक्साच्या राजा होता त्याचे हातारवालीं आलीं, त्याचे गुणास तें राज्य योग्य होतें; आणि जें मिळविलें
८०८ तें त्याणें आपले चातुर्यानें राखिलें. एग्बर्टानें सर्व हेप्तार्कीचे मुलूख एका अमलाखालीं आणिले, आणि आपले शक्तीस शोभा आणाया करितां विंचीस्तर शहरांत धर्म पक्षपाती आणि इतर सर्वलोक जमा करून मोठ्या उत्साहानें आपणास इंग्लंडाचा राज्याभिषेक करून घेतला. तेह्मांपासून त्या एक झालेल्या मुलखास इंग्लंड हें नाव चालत आहे.

साक्सनी लोक पहिल्यानें ब्रिटनांत आले त्यापासून चारशें वर्षांचा सुमारें त्यांचीं सर्व धाकटीं धाकटीं संस्थानें मिळून एक मोठें राज्य झालें; पुढें त्या राज्याची अबादानी, आणि बढती होईल असा योग त्या समयीं दिसत होता.

त्या काळीं सेंट[1] ग्रेगरी ह्मणून एक क्रैस्ताच्या संप्रदायी होता; त्याणें साक्सनी लोकांस क्रै-

---

१ सेंट ह्मणजे जो धर्माचरणें करून श्रेष्ठ तो.

स्ती

स्ती धर्मांत आणावयाकरितां, ब्रिटेनांत धर्मोप-
देशक पाठविले. अशी कथा आहे कीं, तो पोप ह्या-
याचे पूर्वी एके दिवशीं, रूम शहरांत जेथें दास
आणि दासी विकत असत त्या वाटेनें जात होता;
त्या वेळेस त्याणें कितिएक सुंदर मुलें विकायास
बसविलीं होतीं, तीं कोणत्या देशचीं यांचा शोध
केला. तेव्हां तीं इंग्लंड देशांतलीं आहेत, असें
त्यास समजतांच तो लातिने भाषेंत बोलिला.
नन आंग्ले, सेड आंजिले फारेंट सैएसेंट क्रि-
स्तियानै, याचा अर्थ असा कीं जर हीं क्रिस्ति-
यन होतील तर यांस इंग्लिशांची तर काय प-
रंतु देवदूतांची योग्यता येईल — तेव्हांपासून त्या अ-
ज्ञानी लोकांस क्रैस्ती धर्मांत आणावे अशी इछा
त्याचे मनांत फार उत्पन्न झाली. आणि त्या करि-
तां त्याणें आगुस्तिन या नावाचा महंत, तसेच

१ रूम शहरांत जो क्रिस्तियन धर्माचा मुख्य व्यवस्थापक असे त्याचें नाव.

२ बहुत करून सर्व युरोप देशांत जा भाषा बोलतात त्यांची मूळ संस्कृता सारिखी एक भाषा आहे तिचें नाम लातिन.

त्या संप्रदायाचे कितिएक दुसरे लोक ब्रिटेन देशांत पाठविले.

हा भक्तिमान् महंत थानेट बेटांत आतांच, त्याणें केंत प्रांताचा राजा एथेल्बर्ट होता त्याला आपल्या एके दुभाष्या बरोबर निरोप सांगून पाठविला कीं, मी रूम शहरांतून तुमचा उद्धार कराया करितां आलों आहें. राजानें तें ऐकोन लागलेंच त्यांस जें काय साहित्य पाहिजे होतें तें देवविलें; आणि आपण त्यांचा धर्म घेणार कीं नाहीं हें कांहींच त्यांस नसांगतां त्यांचे भेटीस गेला: राजानें आपला उत्कृष्ट सत्कार केला हें पाहून आगुस्तिनाचा मनांत आपला बेत सिद्धीस जाईल असा धीर आला; आणि तो पहिल्या पेक्षां अधिक उत्साहानें लोकांमध्यें गास्पिल[२] सांगूं लागला. नंतर त्या राजानें मोटा समारंभ करून कैस्ती धर्म घे-

१ जो विषयोपभोग करीत नाहीं व जो आपलें आयुष्य बहुत करून पुण्य कर्मांत घालवितो तो.

२ गास्पिल म्हणून ग्रंथ आहे. त्यांत सर्व इंग्लिशांचा धर्माचें कथन केलें आहे.

तला, मग त्याचें तें कर्म पाहून लोकांचाही मनांत ती गोष्ट भरली; आणि शेंकडों लोक स्वेछेनें क्रिस्तियन व्हाया करितां येऊं लागले, त्यांस तो उपदेशक सांगूं लागला कीं, आह्मी क्रैस्ती धर्मांत आणायासाठीं कोणावर जुलूम करीत नाहीं; ज्याची इछा असेल त्याणें यावें. या रीतीनें दुसऱ्या राज्यांतही तो धर्म अनुक्रमानें प्रसृत झाला. आणि इंग्लिश असे पूर्वी क्रैस्ती धर्माचा द्वेष करीत असत, तसेच ते पुढें पोपाचा सर्व आज्ञा मानूं लागले.—



## प्रकरण ३

### डेन लोकांचे चढावाची कथा सन ८३७ पासून १०६६ पर्यंत.

इंग्लंड देशांत स्वस्थता, आणि एकमत

१ डेन्मार्क ह्मणून ब्रिटेनाचे ईशानी दिशेस देश आहे तेथे रहाणारे लोक ते डेन.

चुकतें झालें होतें; इतक्यांत डेन या नावांचे लोकांची मोठी जमात बालटिक समुद्राचे तीरींचा देश घेऊन इंग्लंड देश लुटूं लागली. तो देश कसा आहे याचा शोध करायाकरितां पहिल्यानें ते थोडीशी फौज घेऊन तीरीं आले, आणि थोडेंसें लुटून गलबतावर पळून गेलें. या पहिल्या यत्नानंतर सात वर्षांनी ते पुनः नर्थंबर्लंड राज्यांत येऊन उतरले; आणि त्याणीं एक मठ लुटला; ते वेळीं त्यांचीं गलबतें वादळामुळें खराब झालीं होतीं ह्मणून त्यांचा सहज पराभव झाला, आणि देशाचे लोकांनीही त्यांस मारिलें. इंग्लंडांत एग्बर्ट राजा झाल्यानंतर पांच वर्षांचीं त्याणीं येऊन मोठा हल्ला केला; तेव्हांपासून ते सतत धट्टाईनें हल्ले करीत गेले, शेवटीं सर्व मुलूख त्यांचे स्वाधीन झाला.

जरी त्यांचा पराभव होत असे, तरी नेहमी

१ महंत ह्मणोन जे मागें सांगीतलें त्यांचे राहायाचा ठिकाणास मठ असें ह्मटलें आहे.

त्यांचा बेत सिद्धीस जाई. ते मुलूख लुटून, लूट घेऊन जात. जोंपर्यंत लढाई वांचून चालेल तोंपर्यंत युद्ध करूं नये, आणि साऱ्या मुलूखभर फिरून जें न्यायाजोगें सांपडेल तें स्वदेशीं घेऊन आवें, अशी त्यांची पद्धत होती.

शेवटीं त्या मुलखांत आपण एक ठाणें क-
सन ८३९ रावें, असा त्याणीं निश्चय केला, आणि थाटेन बेटांत येऊन तेथें वस्ती केली. नंतर तेथे एथेलवुल्फ राजानें जाऊन युद्ध करून जय मेळविला, तरी त्याणीं आपलें संस्थान राखिलें. त्या एथेलवुलफ राजानंतर एथेलबाल्ड राजा झाला, त्याणें फार दिवस राज्य केलें नाहीं; परंतु पुढें लोकांनी निंदा करावी अशी योग्यता प्राप्त व्हाया पुरतीं दुष्कर्में मात्र त्याणें थोडक्या काळांत पुष्कळ केलीं.

सन ८६७ या राजाचा राज्यानंतर एथेलरेड म्हणून राजा झाला तो मोठा शूर होता, परंतु डेन लोकांचा दंगा बंद करायास समर्थ झाला नाहीं. त्या उद्योगास राजाचा धाकटा भाऊ आलफ्रेड नामें

होता

होता तो मदत करीत असे, म्हणून त्याचें प्रतिष्ठनाम आल्फ्रेड दि ग्रेट¹ असें पडलें. त्यास राजानें बापाचे वेळची संपत्ती दिली नव्हती, तो आवेश घालवाया करितां लोकांचें बरें करण्याविषयीं तो फार प्रवृत्त होत असे; एथेलरेडाचे राज्यांत डेन लोकांनीं मर्शिया प्रांतपर्यंत येऊन, हिंवाळ्याचे दिवशीं नातिंगम शहराजवळ तळ दिला; तेथून त्यांस काढून द्यायाचा उद्योग राजा करीत होता.
सन ८७१ त्या समयीं एके लढाईंत घाय लागून तो मेला. मग त्याचा भाऊ त्या राज्याचा अधिकारी झाला. तें राज्य त्या समयीं अगदीं मोडत आलें होतें.

डेन लोक, नर्थंबर्लंड, आणि ईष्टआंग्लिया, हे तालुके घेऊन वेसेक्स तालुक्याचे मध्यापर्यंत येऊन पोंहोचले. त्या समयीं मर्शिया देशांतले लोक जमून आल्फ्रेड राजाशीं द्वेष करूं लागले; त्या राजास दुसऱ्या प्रांतांतले लोकांवर

१ दि ग्रेट म्हणजे महान्. अशीं राजांचे गुण आणि कर्मे यांवरून नावें पडत असतात.

भरवंसा ठेवितां नये; त्या समयीं दंग्याचे भयामुळें जमिनीची कोणी लागवड करीना असें झालें; आणि सर्व देवालयें आणि मठ जळून गेले. अशा भयंकर दशेंत सर्वत्र संकटें दिसूं लागलीं; आणि लोक केवळ निराश झाले. परंतु एका पुरुषाचें चातुर्य आणि सदाचरण यांहीं करून त्या समयीं सुख, स्वास्थ्य, आणि बंदोबस्त हीं राज्यांत पूर्वी सारिखीं झालीं. त्या समयींचा सर्व संकटांचा परिहार आल्फ्रेड राजानें केला.

या राजाचा जन्म आपला दुखीदेश राखावयासच केवळ झाला नाहीं; मनुष्यमात्रास सुशोभित करावया करितां झाला. त्याणें लहान वयांतच आपले गुणाची प्रतीति दाखविली. त्याचे बापानें त्याला रूम शहरास विद्याभ्यासा करितां पाठविला होता, तेव्हांच पोपलिओ याणें हा पुढें राजा होईल असें म्हणून त्यास अभिषेक केला. तो तेथून परत आल्यानंतर प्रतिदिवशीं त्याजवर बापाची प्रीति अधिक होत चालली.

अशा

अशा लाडानींच प्रथम वयांत त्यास विद्याभ्यास झाला नाहीं असें दिसतें. त्याचें वय वीस वर्षांचें झालें त्या वेळेस त्यास विद्यांचीं सामान्य स्वरूपें ही ठाऊक नव्हतीं. त्यानंतर एके समयीं त्यानें कांहीं साक्सनी पद्यरूप ग्रंथ ऐकिले, त्यांत शूरांची प्रशंसा होती; तें ऐकून त्याचें चित्त व्यग्र झालें; आणि त्या शूरांसारिखी आपण कीर्ति मिळवावी, आणि ती पुढें लोकांनी गावी म्हणून ग्रंथही आपणास करितां यावे; अशी त्यास इच्छा झाली. त्याचे आईनें त्यास धीर दिला आणि त्याची बुद्धी त्यास सहाय झाली म्हणून तो ते ग्रंथ वाचायास लवकर शिकला. त्यानंतर तो लातीन पुस्तकेंही वाचूं लागला; नंतर त्यास विद्येविषयीं अभिरुची उत्पन्न झाली.

तो तक्तावर बसतांच त्यास डेन लोकांचा पराभव करणें प्राप्त झालें. ते लोक बिलटन शहर घेऊन सर्व मुलूख लुटींत होते. त्याणें घाईनें जितकी फौज मिळाली तितकी घेऊन त्यां-

शीं

शीं मोठें भयंकर युद्ध केलें, परंतु त्यासमयीं डेन लोकांचाच जय झाला. आपला पराभव झाला म्हणून राजाचा उत्साह कमी झाला नाहीं, आणि थोडके दिवशीं त्याणें दुसरी लढाई करायाची हिमत धरली. तेह्वां त्याचें धैर्य आणि उद्योग पाहून शत्रूभयानें तहाचें बोलणें करूं लागले, तें त्याणें मान्य केलें. त्या तहनाम्यांत शत्रूनीं मुलूख सोडून जायाचा करार केला होता, परंतु त्याणीं तो मोडला, आणि इतकें मात्र केलें कीं, एके ठिकाणापासून जाळीत आणि विध्वंस करीत दुसरे ठिकाणी गेले.

ते समयीं राजास असें वाटलें कीं जांचें निवारण एके ठिकाणीं राहिलेले फौजेचे हातून झालें नाहीं; जे तहाचे प्रतिबंधास मोजिनात, आणि जे चारही दिशांकडून येऊन हल्ला करितात, त्यांचे यत्न चालूं नदेणें हें माझे हातून होणें कठीण. प्रतिवर्षीं शत्रूंचा नव्या टोळ्या येत, आणि नवे नवे उपद्रव होत असत; या दुःखाकरितां त्याचा प्रजांतून कितिएक लोक वेल्स प्रांतांत गेले; आणि

कितिएक परदेशांत निघून गेले; दुसरे कितिएक शत्रूंस शरण गेले, आणि त्यांचे आधीन होऊन आपला जीव वांचिवते झाले. असे सर्वलोक राज्य सोडून जाऊं लागले, त्या समयीं राजानें त्यांस आपला देश आणि आपला राजा यांचे सेवेविषयीं आचरण कसें करावें, हें सांगायाचा उद्योग केला; परंतु तो निष्फळ झाला; असें पाहून त्याणें त्या दुष्ट समयास मान दिला, आणि आपली सर्व संपत्ती टाकून फौजेस निरोप देऊन, आपण शेतकऱ्याचें सोंग घेऊन, कांहीं दिवस एके गुराख्याचा घरीं राहिला. असा दडून राहिला होता, आणि चहूंकडून शत्रूंचें भय मानी; परंतु त्याचा असा निश्चय होता कीं, मी आपल्या देशीं राहून शत्रूंपासून देश मुक्त करायाचा समय येई तों पर्यंत वाट पाहीन. तो राहिला होता तें एकांत ठिकाण समर्सेट प्रांतीं होतें, तेथें पॅरिट आणि थोन या दोन नद्यांचा संगम आहे. तेथें तो गायनानें आपले मनाची विश्रांत करीत असे. अशी कथा आहे.

हे कीं एके दिवशीं गुराख्याचे बायकोनें तो राजा असें न कळून, त्यास कांहीं पक्वान्नें शिजत लाविलीं होतीं तीं पहायास सांगीतलीं; आणि आपण बाहेर गेली. तेव्हां त्याचें मन कांहीं दुसरे विचारांत गुंतलें होतें म्हणून, तीं जळून गेलीं तरी त्याणें पाहिलीं नाहींत. मग ती बायको परत आली तेव्हां, त्याला पुष्कळ रागें भरून बोलिली— तेथें जायाचा पूर्वी त्या आल्फ्रेड राजानें, आपले कितिएक विश्वासू लोकही होते त्यांस असें सांगून ठेविलें होतें, कीं जर समय आला तर सर्वांनीं जमा होऊन शत्रूशीं युद्ध करावें— ते त्याचे मित्र आपले राजाविषयीं इमानानें चालत होत्साते समर्सेट प्रांतांतील अरण्याचा आश्रय करून होते. तेथून त्याणीं शत्रूंचा टोळ्या फिरत होत्या त्यांजवर हल्ला केला. तेथें ते जयपावले. मग दुसरे कितिएक लोक त्यांस सहाय झाले. पुढें ते पुष्कळ जमा होऊन आपले राजाजवळ गेले, तेव्हां दुष्काळामुळें तो मोठ्या विपत्तींत होता.

त्या काळीं अबा या नावाचा एक पुरुष डेन लोकांचे सरदारां मध्यें मुख्य होता. त्याणें सर्व मुलूख भयाभीत केले. तो सर्व वेळस मुलुखांत लुटूं लागला. त्याचें निवारण कोणी करूं शकला नाहीं, परंतु तो परत येऊं लागला ते समयीं, केनुइथ किल्याजवळ त्याचा पराभव झाला. तो असा त्या किल्यांत डेवन मांताचा अर्ले[1] थोडकेच फौजेनिशीं होता— त्या शूर योद्ध्यानें असा विचार केला कीं अशा दगलबाज शत्रूंचे स्वाधीन किल्ला करणें हें फार वाईट. मग त्याणें शत्रूंनी किल्यास वेढा घातला होता तें नसाहून असा निश्चय केला कीं चढाव करून शत्रूंस तोडून मारावे. तो त्याचा निश्चय त्याचे सर्व फोजेनें मान्य केला. डेन लोक आपल्या मोठे फौजेवर भरवसा ठेवून, शत्रूंशीं गणना करीत नव्हते; परंतु त्या वेळेस त्यांचा पराभव झाला, आणि त्यांचा सरदार अबा होता तो मेला मेला.

१ अमात्यांत तिसरे पदवीचा अधिकारी असतो त्यास अर्ले ह्मणतात.

पूर्वी साक्सन लोकांची हिमत खचली होती, परंतु हा जय झाला त्यामुळें त्यांस पुनः धीर आला. तेव्हां आल्फ्रेड राजानें ते निर्भय झाले असें जाणून, आतां तुम्हास शत्रूंचें कांहीं भय नाहीं म्हणून उद्योग चालू करावा असा त्यांस धीर दिला. मग लवकरच, त्याणें आपण कोठे लपून राहिलों आहें हें त्यांस कळविलें; आणि सांगून पाठविलें कीं, मी खूण केली म्हणजे लागलेंच सर्वांनीं फौजेसहित सिद्ध व्हावें. परंतु शत्रूंची फौज आणि त्यांचें ठिकाण यांचा शोध करून सांगणारा त्यास कोणी विश्वासू मिळेना. म्हणून त्याणें तें कठीण काम आपण स्वतः करायास आरंभिलें. तो गुराख्याचा साधा वेष धरून हातांत एक सारंगी घेऊन डेन लोकांचा लष्करांत गेला, आणि आपली गायनकला दाखवून लोकांचें मनोरंजन करूं लागला. त्याची तेथे इतकी प्रतिष्ठा झाली कीं, डेन लोकांचा गथ्रम नामें राजा होता त्याजवळ त्याचा प्रवेश झाला. त्यास कांहीं दिवस

राजानें

राजानें आपले जवळ ठेवून घेतला होता- तेथें त्याणें डेन लोकांमध्यें बंदोबस्ताविषयीं सुस्तपणा, इंग्रेज लोकांशीं द्वेष, लुटण्याविषयीं आणि नाश करण्याविषयीं अनास्था, आणि लुटीनें जें मिळालें असेल तें उधळून टाकावें, असें लक्षण पाहिलें. असा तो जें पहावयाचें होतें तें सर्व पुरतेपणीं पाहून, आपले मुळचे ठिकाणीं आला; आणि त्याणें आपले प्रजांजवळ विश्वासू जासूद पाठवून त्यांस कळविलें कीं, तुह्मीं मला सेलवुडाचे रानांत येऊन भेटा. तो निरोप त्याणीं मोठ्या हर्षानें मान्य केला.

नंतर आलफ्रेड राजानें जा ठिकाणीं शत्रूंचा पहारा नव्हता त्या अंगानें जाऊन हल्ला केला; तेव्हां डेन लोक, इंग्रेज लोक केवळ पराजित झाले आहेत असें समजून होते; ते एकाएकीं त्यांची फौज पाहून मोठे विस्मित झाले. ते वेळीं शत्रूंचें निवारण करायास त्यांचा यत्न चालला नाहीं. यद्यपि त्यांची फौज इंग्रेज लोकांपेक्षा अतिशय

मोठी

मोटी होती, तथापि त्यांचे पुष्कळ लोक मेले आणि बाकीचे पळाले. मग जे पळाले होते, ते जवळचे एक बळकट किल्यांत त्यांचें ठाणें होतें तेथें गेले, परंतु आंत सामान नाहीं सारिखें झालें त्यामुळें, ते पंधरा वीस दिवसांचे आंत तो किल्ला सोडून देऊन शत्रूंस शरण गेले- असें त्याणीं शहाणपण केलें. जांचा क्रिस्तियन धर्म घ्यायाची आवड नव्हती ते, राजाचे हुकुमानें आपले एके हेस्तिंग्स या नावाचे सरदारास मुख्य करून फ्लांडर्स देशास गेले. त्यांचा राजा गथ्रम होता त्याणें आणि दुसरे सरदार लोकांनीं क्रैस्ती धर्म घेतला.

आल्फ्रेड राजा त्या समयीं मोठ्या प्रतिष्ठा पर्वताचे शिखरीं बसला. त्यास राज्य प्राप्त झालें तेवढें त्याचे पूर्वीचा कोणत्याही राजास झालें नव्हतें. वेल्स प्रांतांतील राजे त्यास करभार देऊं लागले; नर्थंबर्लंड प्रांतांतील लोकांनीं, त्याणें सांगीतलेली आज्ञा केली. त्या वेळेस किंचित् ही भयाची शंका ज्याया जोग्या कोणीच शत्रू राहिला

नाहीं

नाहीं. तशी संपत्ति आणि स्वास्थ्य बारा वर्षेंपर्यंत चालिलें होतें. त्या काळीं **आलफ्रेड** राजा राज्याचें स्वास्थ्य होण्यास उपयोगी जा विद्या त्यांची वृद्धी करण्याचा उद्योग करीत होता; तसाच युद्धामुळें जो राज्यांत नाश झाला तो नीट करायाचाही प्रयत्न त्याचा चालिला होता.— त्याणें मनांत असा निश्चय केला कीं, जसा मी आपला देश बाहुबळानें राखिला, तसाच मी तो कळा कौशल्यांहीं भूषित करीन, त्याणें राज्यांत बंदोबस्ता करितां कितिएक कायदे केले. आपल्या देशांत विद्याभ्यास वाढावा असें जें त्याणें लक्ष्य धरिलें तेणें करून लोक विशेष सदाचरणी झाले. त्यांचा वाईट खोडी होत्या त्या गेल्या. तो राज्य करूं लागला तेव्हां, त्याणें इंग्लिश लोक मोठ्या अज्ञान दशेंत आहेत असें पाहिलें; त्याचें कारण, पूर्वीं त्या देशीं नेहमी गडबड चालिली असे; आणि **डेन** लोक नेहमीं येऊन लुटीत असत. त्याणें म्हटलें आहे कीं "मी जेव्हां राज्य करूं लागलों त्या वेळेस **टेम्स** नदीचा दक्षिणेस

एक

एकही पुरुष असा नव्हता कीं ज्यास लातिन भाषा येत आहे" मग त्यास उपाय त्याणें असा केला कीं, सर्व युरोप देशांतून मोटमोटे विद्वान् बोलावून आणून आकूसूफर्ड शहरांत जी युनिवर्सिटि* आहे ती उत्पन्न केली; किंवा तेथें युनिवर्सिटि पहिली होती ती बंद झाली होती, ती पुनः त्याणें चालू केली असें ह्मटलें तरी होईल. तीस पुष्कळ स्वास्थ्य करून ठेविलें, आणि आपल्या आचरणावरून त्याणें लोकांचा मनांत विद्याभ्यास करावा अशी गोष्ट आणून दिली. त्याणें आपले काळाचे समान तीन विभाग केले होते; एक विभागांत निद्रा, भोजन, आणि करमणुक; दुसऱ्या भागांत काम कारभार; आणि बाकीचा काळांत विद्याभ्यास, आणि पुण्यकर्मे. व्याकरण, अलंकार, सृष्टिविज्ञान, शिल्प, आणि [illegible] या शास्त्रांत त्याचा बहुत अभ्यास

---

* युनवर्सिटी ह्मणजे अनेक विद्या, कळा, कौशल्यें शिकवायाच्या शाळांचा समुदाय एकस्थळीं असतो ती. अशाशाळेस पुढें कचित सर्व विद्यालय असेंही ह्मटलें आहे.

होता;

होता; त्यासारिखा कवीतर त्यासमयीं एकही नव्हता. त्याणें बहुत ग्रंथ केले, त्यांतून कितिएक आजूनही आहेत. जे गुण मनुष्याचे ठायीं चांगलेपणाची परिपूर्णता आणितात, ते समग्र त्याचे ठायीं वसत होते— त्यांत आणखी नवल हें कीं, जे गुण स्वभावतः परस्पर विरुद्ध ते त्याचे आंगीं भूषणरूपानें होते. तें असें कीं, तो आग्रही असून मृदु; अल्पतृष्ण असून महत्कर्मारंभ करणारा; नीतिमान होत्साता दयाळू; ज्याची आज्ञा कडक असून भाषण गोड, असा होता. अशा सद्गुणाचा कांहीं चांगला उपयोग व्हावा असेंच जाणून, मनांत आणून, देवा-
९०० नें त्यास शरीरसंपत्तिही यथास्थित दिली होती. बळ, सौंदर्य, रमणीय आणि हास्यमुख चेहेरा, हे ही शरीराचे गुण त्यामध्यें होते.

त्या राजानंतर त्याचा मुलगा एडवर्ड [illegible]ला. त्याचा नंतर आल्फ्रेड राजाच्या राखेचा पोटचा मुलगा आथेल्स्तन राज्य करूं लागला; तो जरी अस्सल नव्हता, तरी तो राज्य पावला याचें कारण

रण कीं, त्या काळीं तशी चाल होती. **आथेलस्तन** राजा सोळा वर्षें राज्य करून **ग्लोसेस्तर** शहरांत
९४२ मेला त्यानंतर त्याचा भाऊ **एड्मंड** राजा झाला. त्यास पूर्वींचा राजा सारिखाच **नर्थंब्रियन** लोकांनीं उपद्रव केला; परंतु त्याचा उद्योगापुढें त्यांचें बळ चालिलें नाहीं. तो राजा दुष्ट लोकांचें पारिपत्य करी- शेवटीं तो त्यांचे हातूनच मृत्यु पावला. **लिआल्फ** म्हणून एक चोर होता, त्याणें एके दिवशीं राजा जेवीत होता त्या ठिकाणीं धट्टाईनें जाऊन त्याचा वध केला. त्यानंतर त्याचा भाऊ
९४५ **एद्रेद** राज्य करूं लागला. त्याचे पूर्वजाप्रमाणें त्यासही समजलें कीं आपल्यास दगलबाज लोकांवर राज्य केलें पाहिजे. **डन्स्तन** म्हणून कोणी एक महंत होता, तो धर्म प्रकरणीं आणि राज्य प्रकरणांत जें जें सांगे त्या त्या प्रमाणें तो करी. त्या उद्योगी पुरुषाचा योगें करून सर्व राज्य पेपॅल[*] ह्याचे संधानांत आलें होतें; परंतु

[*] पोपाचे आज्ञेप्रमाणें चालणारे ते पेपल

त्याचा यत्नास राजाच्या मरणाचा प्रतिबंध झाला. एद्वेड राजा गळ्यांत कांहीं रोग झाल्या मुळें राज्य करूं लागल्यापासून दहावे वर्षी, सन ९५९ नऊशें पंचावन्नांत मृत्यु पावला.

एद्वेड राजाचे मुलगे त्या वेळेस राज्य करायाजोगे नव्हते म्हणून, त्याचा पुतण्या एद्वीनामे होता त्यास तक्तावर बसविलें. तो परमगुणी, आणि शूर होता खरा, परंतु जें राज्य त्यास करायाचें, त्यांत अशा शत्रूंशीं प्रसंग होता कीं, त्यांस मोडायास शौर्यादिगुण विशेष उपयोगी पडुं नये. डनुस्तानानें असा विचार केला कीं जसें पूर्वीचें राज्य आपले आज्ञे प्रमाणें चालिलें होतें तसेंच हेंही चालवावें; म्हणून एद्वीराजास राज्य प्राप्त होतांच त्याचा आणि महंताचा तंटा लागला; तो त्या राजाचे गुणांनी किंवा पुण्यें कांहीं मिटेना.

त्या महंताचा क्रूरकर्मांतून एक गोष्ट लिहिली आहे, ती सांगतों. राजाचा नात्याची एक

स्त्री

स्त्री होती तिचें नाव एल्गीवा; तिच्या सौंदर्यानें तो तरुण राजा मोहित झाला; आणि कारभाऱ्यांचे मसलती वांचून तिशीं लग्न करिता झाला. तिचें आणि त्याचें नातें होतें त्यामुळें तें लग्न धर्मशास्त्राशीं विरुद्ध झालें. त्या राजास राज्याभिषेक झाला ते दिवशीं, त्याचे मोटे मोटे कारभारी खाण्यापिण्याच्यां रंगांत असतां, राजा आपले बायकोचे खोलींत गेला. तेथें सासू आणि बायको या दोघींशीं आनंदानें गोष्टी बोलत बसला होता; इतक्यांत तो कोठें दिसेना असें पाहून महंत क्रोधानें त्या खोलींत गेला, आणि राजास रागें भरून बोलून बाहेर काढिता झाला.

डनूस्तानास कितिएक शत्रू होते, त्याणीं राजास मसलत सांगीतली कि या अन्यायाकरितां डनूस्तानाचें शासन करावें; ते या रीतीनें किं पूर्वींचा राज्यांत जो पैका त्याचे स्वाधीन ठेविला होता त्याचा हिशेब त्यापाशीं मागावा. त्याप्रमाणें राजानें हिशेब मागीतला असतां डन्स्तानानें